कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक कामगार आयुक्त, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.८९ (भाग-१)/कामगार-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ जून, २०२३.

वाचा:- "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५"

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व कलम ४ (५) मधील तरतूदीनुसार खाली नमूद केलेल्या कामगार आयुक्त, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक कामगार आयुक्त, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्व मान्यतेने विनंती बदली करण्यात येत असून त्यांना खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्रीम.तरन्नुम अत्तार | मुंबई उपनगर (पूर्व) | अपर कामगार आयुक्त कार्यालय, पुणे (पिंपरी चिंचवड महानगरपालिका क्षेत्रातील क व ड प्रभागांतर्गत येणारे क्षेत्र, पुणे कॅंप, खडकी कॅंप, पुणे महानगर पालिका क्षेत्रातील भवानी पेठ क्षेत्रीय कार्यालयांतर्गत येणारे क्षेत्र तसेच दौंड व इंदापूर तालुका क्षेत्र) |
| २ | श्रीम.नि.वा.नगरारे | नागपूर | मुंबई उपनगर, पश्चिम (के-२ वॉर्ड) |
| ३ | श्री.सु.म.गायकवाड | पुणे | सोलापूर |
| ४ | श्री.वि.तु.शिंदे | ग्रामीण विभाग कार्या-११, मुंबई शहर | मैत्री कक्ष |
| ५ | श्रीम.अ.वि.क्षिरसागर | मुंबई उपनगर (पश्चिम) | कल्याण |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. कामगार आयुक्त, मुंबई यांनी उपरोक्त सहायक कामगार आयुक्त यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करुन, त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. वरील विनंतीने बदली झालेल्या अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व अन्य लाभ अनुज्ञेय होणार नाहीत.

४. बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारीत केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी/कर्मचारी, विभागीय चौकशी नियमपुस्तिका १९९१ च्या प्रकरण-२ मधील कलम २.१ (२) (पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६२२१८५२२८७८१० असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2023.06.22 18:53:19 +05'30'

**( दिपक पोकळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

कामगार आयुक्त, कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. कामगार उप आयुक्त (प्रशासन) कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
४. सर्व संबंधित अधिकारी (कामगार आयुक्त यांचेमार्फत)
५. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुदेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
६. संबंधित सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. उप सचिव (कामगार-८) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवडनस्ती (कामगार-८).